सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये सक्षम अंगणवाडी या केंद्र पुरस्कृत योजनेकरिता निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२३/प्र.क्र.११८/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :-१२ जुलै,२०२३

संदर्भ:- १) केंद्र शासनाचे पत्र क्र. CD-II-३/२०२१-CD-I-Part(२), दि. ०४.०३.२०२२.
२) केंद्र शासनाचे पत्र क्र. CD-II-१४/१८/२०२२-CD-II (e-१०२७५२), दि. १६.०२.२०२३.

**प्रस्तावना :-**

सक्षम अंगणवाडी या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत राज्यातील गडचिरोली, नंदुरबार, उस्मानाबाद, वाशिम या आकांक्षित जिल्ह्यांमधील केंद्र शासनाने निवड केलेल्या स्वमालकीच्या अंगणवाडी केंद्रांत १) पोषण वाटीका, २) रेन वॉटर हार्वेस्टिंग, ३) आर.ओ. युनिट, ४) एल.ई.डी., ५) अदर इन्फ्रास्ट्रक्चर इत्यादी सुविधा उपलब्ध करून देण्याबाबत केंद्र शासनाने संदर्भाधीन पत्रान्वये निर्देश दिलेले आहेत. त्याकरिता प्रति अंगणवाडी केंद्र रुपये १ लाख च्या मर्यादेत केंद्र शासनाने निधी अनुज्ञेय केलेला आहे. त्याकरिता केंद्र शासनाने राज्यात सक्षम अंगणवाडी या योजने अंतर्गत खालीलप्रमाणे घटकनिहाय निधी मंजूर केलेला आहे.

| अं.क्र. | घटक | अंगणवाडी केंद्र संख्या | प्रति अंगणवाडी/ प्रति युनिट वित्तीय मर्यादा | एकूण रक्कम (रु. लाखात) |
|---|---|---|---|---|
| १. | पोषण वाटिका | ९०३ | रु. १०,०००/- | ९०.३० |
| २. | रेन वॉटर हार्वेस्टिंग | ११४५ | रु.१६,०००/- | १८३.२० |
| ३. | RO युनिट | १०८२ | रु.१०,०००/- | १०८.२० |
| ४. | एल. ई.डी. | १४९ | रु. २५,०००/- | ३७.२५ |
| ५. | इतर पायाभूत कामे | ११५० | रु.३९,०००/- | ४४८.५० |
| | **एकूण** | | | **८६७.४५** |

त्यानुषंगाने सदर प्रयोजनाकरिता उपरोक्तप्रमाणे निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सक्षम अंगणवाडी या केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत राज्यातील गडचिरोली, नंदुरबार, उस्मानाबाद, वाशिम या आकांक्षित जिल्ह्यांमधील केंद्र शासनाने निवड केलेल्या स्वमालकीच्या अंगणवाडी केंद्रांत १) पोषण वाटीका, २) रेन वॉटर हार्वेस्टिंग, ३) आर.ओ. युनिट, ४) एल.ई.डी., ५) अदर इन्फ्रास्ट्रक्चर इत्यादी सुविधा उपलब्ध करून देण्याकरिता खालील विवरणपत्रातील रकाना क्रमांक १ मधील लेखाशीर्ष / उद्दिष्टांकरिता रकाना क्रमांक ३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे एकूण रुपये ८६७.४५ लाख (अक्षरी रुपये आठ कोटी सदुसष्ट लाख पंचेचाळीस हजार फ़क्त) इतका निधी या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यास व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीत निधी २०२३-२४ | या आदेशान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| २२३६, पोषण आहार,<br>०२, पोषक अन्न व पेये यांचे वितरण.<br>०५१ विशेष पोषण आहार कार्यक्रम,<br>(०१) अंगणवाडी बांधकाम<br>(०१) (०१) अंगणवाडी इमारत बांधण्यासाठी अंगमलबजावणी करणाऱ्या संस्थांना अनुदान (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम)<br>२२३६२१८२, ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) | ३४८०.०० | ५२०.४७ |
| (०१) (०२) अंगणवाडी इमारत बांधण्यासाठी अंगमलबजावणी करणाऱ्या संस्थांना अनुदान (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम)<br>२२३६२१९१<br>३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) | २३२०.०० | ३४६.९८ |
| **एकूण** | **५८००.००** | **८६७.४५** |

२. केंद्र शासनाने यासंदर्भात संदर्भाधीन पत्रान्वये तसेच वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्याची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी घ्यावी.

३. अंगणवाडी केंद्रांचे सक्षम अंगणवाडीमध्ये श्रेणीवर्धन करण्याकरिता अंगणवाडी केंद्रांची निवड करताना सक्षम अंगणवाडी अंतर्गत उपलब्ध करावयाच्या सोयी-सुविधा व आदर्श अंगणवाडी योजने अंतर्गत उपलब्ध करण्यात येत असलेल्या सोयी-सुविधा यांची पुनरुक्ती होणार नाही, याबाबतची दक्षता घेण्यात यावी. त्यानुसार अंगणवाडी केंद्रांचे सक्षम अंगणवाडी केंद्रांमध्ये रुपांतर करण्याची कार्यवाही तात्काळ करून त्याबाबतची यादी स्वतंत्ररीत्या ठेवण्यात यावी व त्याबाबतची माहिती जिल्हा कार्यक्रम अधिकारी (म. व बा. वि.) यांनी आयुक्तालयामार्फ़त शासनास सादर करावी.

४. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या तपासणी सूचीतील बाबींची तसेच यासंदर्भात नियोजन विभाग व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष, वित्तीय अधिकाराचे प्रत्यायोजन यांचे काटेकोर पालन करावे.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक १०१/१४७२, दिनांक २८.०४.२०२३ तसेच वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५२/व्यय-६, दिनांक २३.०५.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०७१२११५७२८९९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2023.07.13 15:47:59 +05'30'

**( वि. रा. ठाकूर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),(लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,

२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई,

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (गडचिरोली, नंदुरबार, उस्मानाबाद, वाशिम)

४) संबंधित विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास

५) जिल्हा कार्यक्रम अधिकारी (म.व बा.वि.),जिल्हा परिषद, (गडचिरोली, नंदुरबार, उस्मानाबाद, वाशिम)

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

७) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,

८) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई,

९) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२) / वित्त विभाग (व्यय-६), मंत्रालय, मुंबई,

१०) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

११) निवड नस्ती -का-६.